**उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे यांनी नवीन शीतसाखळी उपकरणे खरेदीकरिता विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०२४/प्र.क्र.१६८ /आरोग्य-४**
१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-२०२४/प्र.क्र.१९४/आरोग्य-४, दिनांक २०.०६.२०२४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४
३) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांचे पत्र क्र.आसेप/कक्ष-११७/अनुदान/न.क्र.६०/७३८०-८३/२०२४, दिनांक १४.०५.२०२४.

**प्रस्तावना:-**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे यांनी नवीन शीतसाखळी उपकरणे खरेदीकरिता संदर्भीय दिनांक २०.०६.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. यासाठी विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे यांनी नवीन शीतसाखळी उपकरणे खरेदीकरिता विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन **२०२४** मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी रु.**४३,६९,००,०००/-** (रु. त्रेचाळीस कोटी एकोणसत्तर लक्ष फक्त) वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यात येईल या अटीच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर बाब नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची व संनियंत्रण करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई व यांची राहील.

०३. सदर निधी विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यात येईल तसेच योग्य रितीने अदायगी करण्यात येईल याबाबतची जबाबदारी उपसंचालक,आरोग्य सेवा, (परिवहन), पुणे यांची राहिल.

०४ सदर खर्च मागणी क्र. आर-१, २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (००१) संचालन व प्रशासन, ८००-इतर खर्च, उपशिर्ष-८०० : (एक) सार्वजनिक आरोग्य परिवहन संघटनेची आस्थापना, (२२१० १०५३), ५२- यंत्रसामग्री व साधनसामग्री या लेखाशीर्षाखाली मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. या उद्दीष्टांतर्गत मंजूर झालेला निधी संवितरीत करण्यासाठी “प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, (परिवहन) पुणे हे

"आहरण संवितरण अधिकारी" आणि "उपसंचालक, आरोग्य सेवा, (परिवहन) पुणे)" हे "नियंत्रण अधिकारी" राहतील.

०५. सदर शानस निर्णय वित्त विभागाने ई-फाईल नं.९५१६४७, नस्ती क्र. पीएचडी-१७०२४/१३/२०२५-पीएचडी (आरोग्य-४) वर दिनांक २१.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१११२७४६०४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAVITA PRADIP PISE

Digitally signed by KAVITA PRADIP PISE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH AND FAMILY WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=895d4dc43ba3105440c0329431446ae8333ab89578925b2d77d3806165dbd487, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AEEF37624AA6E5EA1AAA99D244C6C2A5F135097E5C07486A35D423835B4EC728, cn=KAVITA PRADIP PISE
Date: 2025.03.31 11:57:27 +05'30'

**(कविता पिसे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
७) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) निवडनस्ती (आरोग्य-४)